**महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून सरळसेवेने निवड झालेल्या मुख्याधिकारी गट-ब संवर्गातील उमेदवारांच्या परिविक्षाधीन प्रशिक्षण कालावधी करिता अधिसंख्य पद निर्माण करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : एमसीओ-२०२३/प्र.क्र.३२७/नवि-१४**

मुख्य इमारत, ४ था मजला,
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ०३२
दि. १२ ऑगस्ट, २०२४.

**संदर्भ :-**

१. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक टीआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.२०.०१.२०१४.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक टीआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ, दि.०३.११.२०१४.
३. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक पदनि २०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दि.२०.०२.२०१६.
४. सामान्य प्रशासन विभाग, कार्यालयीन आदेश क्र. टिआरएन-२०२३/प्र.क्र.२६/सीपीटीपी-अ, दि.१८.०९.२०२३.
५. सामान्य प्रशासन विभाग, कार्यालयीन आदेश क्र. टिआरएन-०६२३/प्र.क्र.४५/सीपीटीपी-ब, दि.१८.०९.२०२३
६. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्रमांक टिआरएन-०६२३/प्र.क्र.४३/सीपीटीपी-अ, दि.२५.०९.२०२३.
७. शासन समक्रमांकांचे दि.०६.११.२०२३ रोजीचे आदेश
८. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक टीआरएन-०६२३/प्र.क्र.४५/सीपीटीपी-ब, दि.१९.०१.२०२४.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राज्यसेवा परीक्षेव्दारे सन २०१४ पासून प्रतिवर्षी सरळसेवेने नियुक्त होणा-या गट-अ मधील पदांसाठी यशदा, पुणे या संस्थेमार्फत व गट-ब मधील पदांसाठी वनामती, नागपूर या संस्थेमार्फत दोन वर्षाच्या कालावधीसाठी एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयानुसार राबविण्यात येत आहे. वित्त विभागाच्या संदर्भ क्र.२ येथील दि.२०.०२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूद व सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.४,५ व ६ येथील कार्यालयीन आदेश व शासन परिपत्रकातील तरतूदी विचारात घेऊन महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्य सेवा (मुख्य) परिक्षा-२०२१ च्या अंतीम निकालाच्या आधारे निवड झालेल्या मुख्याधिकारी गट-अ व मुख्याधिकारी गट-ब मधील परिविक्षाधीन प्रशिक्षणार्थी अधिकारी यांच्यासाठी संदर्भ क्र.६ येथील आदेशान्वये ८५ अधिसंख्य पदे निर्माण करण्यात आलेली आहेत.

तद्नंतर, सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र.७ येथे नमूद दि.१९.०१.२०२४ रोजीच्या आदेशान्वये श्रीमती गौरी पाटील, परिविक्षाधीन मुख्याधिकारी गट-ब या दि.०३.१०.२०२३ पासून सुरू झालेल्या एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-९ करीता वैद्यकीय कारणास्तव रूजू झालेल्या नसल्याने, त्यांना दि.२३.०१.२०२४ पासून एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-९ मध्ये रूजू होण्यास मान्यता दिलेली आहे व त्यांच्याकरीता एक अधिसंख्य निर्माण करण्याची कार्यवाही

करण्याबाबत नगर विकास विभागास कळविले आहे. त्यानुसार, मुख्याधिकारी गट-ब संवर्गामध्ये १ अधिसंख्य पद निर्माण करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०२१ च्या अंतिम निकालाआधारे मुख्याधिकारी गट-ब पदासाठी निवड झालेल्या श्रीमती गौरी पाटील यांना सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.७ येथील कार्यालयीन आदेशानुसार दि.२३.०१.२०२४ पासून एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम-९ अंतर्गत तांत्रिक टप्प्यावर रूजू करून घेण्यात आले आहे. एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम (सीपीटीपी)- ९ अंतर्गत श्रीमती गौरी पाटील, परिविक्षाधीन प्रशिक्षणार्थी मुख्याधिकारी गट-ब, यांना मुख्याधिकारी, गट-ब संवर्गामध्ये १ अधिसंख्य पद वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ येथील दि.२०.०२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार दि.२३.०१.२०२४ ते दि.२९.०९.२०२५ या दोन वर्षाच्या कालावधीसाठी निर्माण करण्याकरीता शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर १ अधिसंख्य पद आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवर निर्माण करण्यात येत आहेत.

२. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील मुख्याधिकारी गट-ब संवर्गातील सदर १ अधिसंख्य पदाच्या दिनांक २३.०१.२०२४ ते दि.२९.०९.२०२५ या दोन वर्षाच्या कालावधीतील परिविक्षाधीन अधिका-यांच्या वेतनावर होणारा खर्च मागणी क्रमांक एफ-२, मुख्य लेखाशीर्ष २२१७, नगर परिषद प्रशासन (२२१७ ००४७) संचालक, नगरपरिषद प्रशासन (२२१७ ००४७) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.७/१६/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०.०२.२०१६ मधील तरतूदीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०२४०८१२१८०३५३२७२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ASHOK KASHINATH LAKKAS

Digitally signed by ASHOK KASHINATH LAKKAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=84261302514df14d17b0d46bb1422d22bfc355b1a840ece50f14894cd6b0da24, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A08E157E090DE76FD7473747C56539E08109C40C5E2E8FE638A0A32B6B0BE227, cn=ASHOK KASHINATH LAKKAS
Date: 2024.08.12 18:19:47 +05'30'

**( अ. का. लक्कस )**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत :-**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई.
२. अप्पर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक.
४. सर्व जिल्हाधिकारी.
५. प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
६. उप सचिव, सीपीटीपी-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. संचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे
८. संचालक (सीपीटीपी), वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था, व्हीआयपी रोड, धरमपेठ, नागपूर-४४० ०१०.
९. वित्त विभाग (वित्तीय सुधारणा-१), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. निवडनस्ती (नवि-१४)